# मला भेटलेले प्रकाशक आणि वितरक

## प्रकर्षाने नोंद करावीशी वाटते मिसळपाव.कॉम संस्थळाची...

विविध प्रकाशकांच्या कहाण्या व लेखकांची व्यथा वाचून मी खरोखर सुदैवी असे म्हणायला हवे. कारण मला भेटलेले भाषांतरकार, प्रकाशक व वितरक खरोखर सचोटीची वागणूक देणारे मिळाले आहेत.

संदेश एजन्सीचे खरे

मराठीत नाडीग्रंथांवरील पहिले पुस्तक सप्टेंबर १९९४ ला पुण्यात दै. सकाळच्या छापखान्यात मी माझ्या हिमतीवर छापले नंतर पुण्यातील संदेश एजन्सीचे खरे यांच्या सौजन्याने कोणताही लेखी वा तोंडी करार न होता त्यांच्याकडून ४५०० प्रतींचे वितरण झाले. उरलेल्या ५०० प्रती मी तांबरम, मद्रासला नेल्या होत्या. त्याही कालांतराने आपला वार्ताहरवाल्या श्री. मुरलीधर शिंगोट्यांच्या तर्फे विकल्या गेल्या. त्याचे पैसे त्यांनी काही महिन्यात देऊन सौदा पूर्ण केला.




नवल असे की श्री. खरे नियतकालिकांचे वितरण करतात. पुस्तकांचे वितरण करत नाहीत. नाडीग्रंथ हा विषय पूर्णपणे अनोळखी. मी लेखक म्हणून शून्य माहितीचा. मराठी वाचक पुस्तके दुकानात विकत घ्यायला वाटवाकडी करून जात नाहीत. किंमतीकडे पाहून हात आखडता घेतला जातो. अशा परिस्थितीत ते पुस्तक अत्यंत माफक किंमतीचे असणे व

सहज जाताजाता हाती यावे यासाठी नियतकालिकाच्या आकारात तयार करून वाचकांनी प्रवासात वा फावल्यावेळात वाचायला मिळावे असा विचार करून १२ रुपयांचे, साप्ताहिकाच्या आकाराचे बनवले होते. ते तसे बनावे असा मला आभासही झाला होता त्याची कहाणी मी पूर्वीच लिहिली आहे.

नाडी ग्रंथांचे वैशिष्ठ्य असे की ज्याला ते पहायची प्रेरणा होते तो जातोच अन्यथा कितीही ठरवले वा मनवले तरी जाणे होणार नाही वा पट्टी सापडणार नाही. असो.

ग्रहांकित मासिकाचे मालक दादा ऊर्फ चंद्रकांत शेवाळे

ग्रहांकित ज्योतिषांच्या वर्तुळातील एक प्रतिष्ठेचे नियतकालिक. त्यात लेख छापून येणे मानाचे मानले जाते. एकदा मी दादा ऊर्फ चंद्रकांत शेवाळे यांच्या तांबड्या जोगेश्वरीजवळच्या कार्यालयात पोहोचलो. त्यांची ओळख ना पाळख पण त्या पहिल्या भेटीत सूर जुळले. नाडी ग्रंथांची ओळख महाराष्ट्रातील अनुभवी आणि चोखदळ वाचकांच्या समोर आणायला ग्रहांकितला प्रथम श्रेय मी देतो. दर वर्षीच्या दिवाळी अंकात माझे लेख आवर्जून ते प्रकाशित करत असत.




नाडी ग्रंथांवर संपूर्ण दिवाळी अंक २०१२ मधे सादर केला गेला. त्याला सर्वोत्कृष्ठ ज्योतिष विषयक मानाचे पारितोषक मिळाले होते. (आता तो ईबुक रूपात उपलब्ध आहे)ऑटो रायटिंग सारख्या गूढविद्या (ऑकल्ट सायन्स) विषयावर लांबलचक लेख प्रकाशित झाल्यावर स्वलेखन हा प्रकार काय आहे? तो प्रत्येकाला शिकता येईल का ? भूते किंवा अज्ञात शक्तींचा प्रादुर्भाव स्वलेखन करणाऱ्यावर पडतो का? वगैरे त्यातून केले गेले होते. या विषयावर वेगळे ईबुक आहे.

डायमंड पॉकेट बुक्सचे नरेंद्र वर्मा




नंतर माझे **हिंदीतील पुस्तक** नवी दिल्लीच्या पुस्तक मेळाव्यात सहज फिरता फिरता डायमंड पॉकेट बुक्सच्या नरेंद्र वर्मांनी 'चायकी चुस्की लेते लेते' सहज हो म्हटले व त्या नंतर मी श्रीनगरहून स्क्रिप्ट पाठवून ते पुस्तक तयार झाले. त्यानंतर त्या पुस्तकाच्या पुढील आवृत्यांचे मानधनाचे पैसै मी न मागता वेळेवर मिळत गेले. नंतर त्यांच्या विचारणे वरून **इंग्रजीतील पुस्तक** तयार

झाले. **त्यात ऑक्टोबर २००९ ला नवीन ७० पानांची व २०२१ मधे ५० पानांची भर घालून हिन्दी आणि इंग्रजीत दिमाखात प्रसिद्ध केली.**

मे. गिरी ट्रेडिंग एजन्सी




**तमिळमधील** नाडीवरील पुस्तकाचे वितरण चेन्नईच्या मे. गिरी ट्रेडिंग एजन्सीने केले. त्यावेळी काही कामाने मी हवाईदलाच्या युनिफॉर्म मधे होतो. श्री. गिरी मला त्या वेषात पाहून म्हणाले, 'मीही पुर्वी हवाईदलात होतो याचा मला अभिमान आहे. तुमच्यासारख्या हवाईदलातील अधिकारी गैरतमिळाने तमिळ भाषेत पुस्तक काढले आहे याचा मला आनंद आहे. तुमचे तमिळ मधील पुस्तक वितरित करायलाच नव्हे तर यापुढे आणखी काही तमिळमधे लिहाल तर मी जरूर माझ्या प्रकाशनातर्फे व्यवस्था करीन.'**तमिळ रुपांतर करणाऱ्या श्री.गोपाळराव** या पुस्तकाचे मानधन त्यांनी एक ही पैसा न घेता ‘महर्षींची सेवा’ म्हणून सुंदर भाषांतर अत्यंत अल्पकाळात करून दिले.

**कन्नड भाषेत** बंगलोरच्या संयुक्त कर्नाटक पेपरग्रुपतर्फे कर्मवीरा नावाच्या साप्ताहिकात माझे १७ लेख २००४मधे छापुन आले होते. त्यांना रुपांतराची परवानगी देऊन मी खरेतर विसरून गेलो होतो. नंतर काही वर्षे गेल्यावर जुनी कागदपत्रे चाळताना सर्व आठवले. त्या नंतर बंगलोरला प्रत्यक्ष भेटीचा योग आला. त्यांच्या बदललेल्या मॅनेजमेंटने क्षमा मागून मला हातोहात मानधनाचा चेक दिला.

गुजराथी जाणकार विदुषी सौ. मेधा दिवेकर...

एक फोन आला. "मी नाडी ग्रंथांचा अनुभव घेऊन आले आहे. त्यानंतर मला आपले मराठीतील छोटे खानी पुस्तक वाचायला मिळाले. आपली परवानगी असेल तर आपल्या पुस्तकाचे गुजराथीत भाषांतर करायला मला आवडेल."

त्या होत्या अहमदाबादेत स्थायिक सौ मेधा दिवेकर. गुजराथी भाषेवरील प्रभुत्वातून त्यांनी कै. डॉ. प. वि. वर्तकांची पुस्तके गुजराथीत अनुवादित केली होती. अशी विदुषी आपणहून भाषांतर करायला परवानगी मागते आहे याचे समाधान वाटून मी आनंदाने होकार देताच त्या महर्षींच्या कामाला लागल्या. रुपांतराच्या मानधनाचे त्यांनी नावच काढू दिले नाही. बडोद्याचे



निलेशभाईं त्रिवेदीनी प्रकाशनाचा खर्च उचलला. पुस्तक सन २००९, ऑक्टोबरच्या १४ तारखेला नाडी ग्रंथावरील दुसऱ्या अधिवेशनात प्रकाशित झाले. मात्र त्याआधी सौ. मेधाताई दिवेकर न्युझीलंडला नातलगांकडे गेल्या म्हणून त्यांची प्रत्यक्ष भेट झालेली नाही...**(सध्या ते पुस्तक बुकगंगा.कॉमवर ईबुक रूपात उपलब्ध आहे.)**

...

**आश्चर्य असे की त्या नंतर बरेच वर्षांनी पुज्य चितळे बाबांच्या घरी त्यांच्या नातलग म्हणून मला भेटल्या. त्यावेळी त्यांच्या मागणीवरून मी त्यांना इंग्रजीतील नाडी प्रेडिक्शन्स - ए माईंड बॉगलिंग मिरॅकल – (२००९ आवृत्ती) पुस्तक हातात दिले. त्या पुर्ण २६० पानांच्या आवृत्तीचे गुजरातीत भाषांतर करून त्या न्यूझीलंडहून पाठवत आणि सुरत मधील दैनिक सामना म्हणून गुजराथी पेपर मधून ते आठवड्याच्या लेखमालेत प्रसिद्ध होत राहिले. ते लेखनकार्य संपवून झाले अन कॅन्सरच्या प्रदीर्घ व्याधीने त्यांची प्राण ज्योत मालवली...**




**‘महर्षींचे महान कार्य गुजराथीतील वाचकांना वाचायला मिळावे म्हणून ते कार्य पुर्ण होईतोवर त्यांनी मला जीवनदान दिले’ असे त्या शेवटी शेवटी फोनवरून बोलताना म्हणाल्या.**

<u>मनोकामनाचे आनंद हांडे... प्रत्यक्षात कधीच न भेटलेले प्रकाशक.</u>

माझ्या अंधारछाया कादंबरीच्या किश्शाची तर फारच मजा. रेल्वेच्या प्रवासात एकांनी मनोकामना प्रकाशकांचे नाव सुचवले. मी पत्रांनी संपर्क करता, 'दहा हजार व हस्तलिखित पाठवावे लागेल. छापल्यावर १० प्रती देऊ' असा आदेश दिला. मी हस्तलिखित पाठवले पण

दहा हजार पाठवायला असमर्थता दर्शवली. काय झाले कोणास ठाऊक त्यांनी ती कादंबरी विना पैसे घेता छापली. 'कोण हे मनोकामनाचे प्रकाशक आनंद हांडे?' पहायला मी आवर्जून इस्लामपुरला गेलो होतो. तेंव्हा भेट झाली नाही. पण १० प्रतींचे बंडल मिळाले. त्यानंतर २५ वर्षे झाली तरी प्रकाशक आनंद हाडे यांची प्रत्यक्ष भेट अद्याप झालेली नाही! **आता अंधारछाया ही कादंबरी ईबुक रूपात वेळोवेळी बुक गंगा, ई साहित्य, अहमदाबादच्या मातृभारती कडून प्रकाशिक झाली आहे. याच मातृभारतीने एका स्पर्धेत माझ्या हवाईदलातील आठवणी आणि प्रेरणा दायी लेखांसाठी २५ हजाराचे प्रथम पारितोषक दिले. जयपुरच्या नामांकित ज्योतिष संस्थेने माझा २०हजार व गौरवपत्र देऊन सत्कार केला होता.**

नितीन प्रकाशनचे श्री. नितीन गोगटे

यांची सचोटी व व्यवसायिकता अत्यंत वाखाणण्याजोगी आहे. लेखी करार करून प्रत्येक आवृत्तीचे मानधनाचे पैसे चेकने देणे, पुस्तक विक्रीचा चोख हिशोब दाखवणे आदि ते करतातच पण त्यांची लेखकांशी सन्मानपुर्वक वागणूक डोळ्यात भरते. त्यांचे श्री स्नेही काळे व अन्य सहकारी तितक्याच आस्थेने व सन्मानाने वागवतात.

आज माझ्या पुस्तकांच्या शेकडो प्रती खपतात. दिल्लीकडे हिंदीत माझ्या पुस्तकाची चोरी करून पुस्तके छापली गेली. पण अजूनही महर्षींच्या आशीर्वादाने सर्व काही सुरळीत पार पडले आहे. **सध्या मी एकाच वेळी लेखक, प्रकाशक आणि वितरक अशा ३ भूमिकात ई पुस्तके सादर करत आहे. साधारण रोज एक पुस्तक जावे अशी अपेक्षा करून सुरवात केली. अनेक प्रतिष्ठित सामाजिक माध्यामांतून पुस्तकांचे जाहिरात व वितरण मोफत होत असल्याने लिहायला आणि सादर करायला हुरुप येतो.**

**या शिवाय प्रकर्षाने नोंद करावीशी वाटते ती मिसळपाव.कॉम या संस्थळाची. नाडी भविष्य हा विषय आणि माझ्यावर जबरदस्त ट्रोलिंग केले गेले तरीही त्या वरील माझे लेखन सतत होत राहिले. ट्रोल करणारे गायब झाले. अंनिससारख्या संस्थांनी विषय टाळून देण्याचे धोरण केले. नाडी पट्ट्यामधील लेखनाचा डेटा बँक म्हणून साठा करून तो या विषयावर अभ्यासूंना संशोधन करायला मोफत मिळावा म्हणून सध्या उपक्रम हाती घेतला आहे.**

2397 वाचने मिपावरील धागा व त्यातील ट्रोलिंग

# कै. मुरलीधर शिंगोटे आणि नाडी ग्रंथ भविष्य




कै. मुरलीधर शिंगोटे आणि नाडी ग्रंथ भविष्य

आज श्री मुरलीधर शिंगोटे यांच्या निधनाची बातमी वाचली आणि काही स्मृती जाग्रृत झाल्या. तो १९९६चा  मे महिना असावा. मला तांबरमहून श्रीनगरच्या हवाईतळावर कामाला रुजु होऊन २ महिने झाले असावेत. त्या काळातील रजेच्या दरम्यान मी मुंबईच्या फोर्ट विभागातून फिरत होतो. दुपारची वेळ. घामाच्या धारा लागल्या म्हणून व्हीटीच्या स्टेशन बाहेरील थंडगार पेय विक्रेत्याला खट्टामीठा बनवायला सांगून फुटपाथवर विकायला आलेल्या काही सांज दैनिकांकडे माझे लक्ष दिले. अंधश्रद्धा निर्मूलन समितीच्या कुठल्याशा पत्रकांतील लेखनावरून दिलेल्या ८ रकान्याच्या बातमीकडे माझे लक्ष गेले. तो होता आपला वार्ताहरचा अंक. काहीतरी भडक लिहून विक्री वाढवायच्या लंगोटीपत्रकारितेच्या अशा तंत्रांमुळे मी प्रथम दर्शनी दुर्लक्ष केले. थंडपेयाचा आस्वाद घेता घेता तो अंक चाळला. संपादकीयातील लेखावर धावती नजर टाकून त्यातील शब्द

कोड्याच्या पानावर जावे म्हणून लेख वाचायला लागलो. अंनिसला खरपुस भाषेत फैलावर घेणारा तो एक अग्रलेख होता. तेंव्हा त्यातील तडाखेबंद भाषेत, दाभोळकरांच्या कुठल्याशा वक्तव्यावर अग्रलेखातून केलेल्या चिरफाडीने त्यांना अक्षरशः उघडे पाडले होते. युक्तिवाद बिनतोड होता. प्रा. अद्वयानंद गळतगे सरांच्या शिवाय नाडी ग्रंथांच्या अदभूततेच्या बाजूने व अंनिसच्या खोट्या व कांगावखोर लेखनाविरुद्ध लिहिणारे त्याकाळात कोणी नव्हते. त्यांच्या लेखनाच्या तोडीचे या संपादकीयातील लेखन वाचून मला मुरलीधर शिंगोटे यांचा संपादक म्हणून एकदम आदर वाटला. या व्यक्तीला भेटायची इच्छा जागृत झाली. निदान त्यांना नाडी भविष्यावरील लेखनातून अंनिसने नाडी ग्रंथांचा अनुभव न घेता केलेला विपर्यास त्यांच्या कानावर घालावा असे वाटून मी लालबागमधील त्या पत्यावर पोहोचलो.

एका गच्चीवजा भागात अस्ताव्यस्त पडलेल्या दैनंदिन पेपर्सचे गठ्ठे, बराचसा रद्दीचा कचरा यावरून मी योग्य ठिकाणी पोचल्याचे लक्षात आले. एका काम करणाऱ्याला ‘मुरलीधर शिंगोटेंना भेटायचे आहे’. म्हटल्यावर, ‘ते काय’ म्हणून एका शिडशिडीत उंच व्यक्तिकडे बोट दाखवले. डोक्यावर पांढरी गांधी टोपी, झब्बा, चुरगाळलेली विजार असा वेशातील व्यक्तीने मला विचारले, ‘मीच शिंगोटे, काय काम आहे?’ मनात मला निराशा वाटली. असा माणूस संपादकीयातील पल्लेदार लेखन करेल का? असा उगीचच विचार डोकावला. मी ओळखपत्र हातात देत म्हटले की आपल्या आजच्या अंकातील संपादकीय वाचून आपण कोण? म्हणून पहायला आलोय. ‘अस्स होय!’ म्हणून त्यांनी एका खोलीकडे बोट दाखवून म्हटले, ‘ते आमच्या भाऊने लिहिलेय. मी नाही!’ आणि आपल्या कामात ते गढले. मी खोलीत गेलो. एक घामट चेहऱ्याचे, चष्मेवाले ग्रहस्थ म्हणाले, ‘हो, तो लेख मीच लिहिला आहे’. ते होते भाऊ तोरसेकर!... त्यांचे अभिनंदन करायला, माझ्यासारख्या हवाईदलातील व्यक्तीने दुरून कुतुहलाने मुद्दाम भेटायला आलेल्या जागृत वाचकाला त्यांचे ते लेखन आवडल्याचे बोल ऐकून फारसा आनंदी चेहरा न करता म्हणाले, ‘अंनिसचे विचार मला पटत नाहीत तेंव्हा मी त्यावर लिहितो ’. मी नाडी भविष्य नावाचे पुस्तक लिहिल्यावर त्यातील ‘चमत्कार’ शब्दाने आकृष्ठ होऊन माझ्यावर टीका करायचे सत्र *दाभोळकरांच्या चेल्यांनी सुरू केले आहे. याची माहिती आपल्याला नसेल तर ती द्यावी म्हणून

आपल्याला भेटायला आलो आहे. म्हटल्यावर ‘बर’ म्हणून उरलेला गार चहा संपवत म्हणाले, ‘मी लेखन करत आहे. त्यात व्यत्यय आलेला मला आवडत नाही. माफ करा’. म्हणून पेन सरसावून ते लिहायला गढले!

‘काय म्हणतात आमचे भाऊ? असे विचारत मुरलीधर शिंगोटे मला आपले काम करत विचारते झाले. ते पानाचा ले आऊट आपल्या पद्धतीने लावत असताना माझ्याकडे न बघता बोलत होते. दुपारचा सार्वजनिक चहा आल्यावर, ‘घ्या’ म्हणून त्यांनी सवड काढून मला बोलते केले.

‘अस्सं’? , ‘मला माहित नाही!’, ‘ते काय असत?’ म्हणून नाडी भविष्याच्या विषयात कुतुहल दाखवले.

‘अरे तिच्या!’,

‘बर, ते का म्हणतात नाही म्हणून?” उत्सुकता दाखवून पुढे म्हणाले, ‘पुस्तक आहे तुमचे?’ मी हातात एक प्रत ठेवली. त्यांनी त्याची पाने किती, प्रकाशक कोण वगैरे पाहून म्हटले, ‘हे पुस्तक छापून काढू का’ ? मला समजावत ते म्हणाले, ‘यातला मजकूर रोज थोडा थोडा करून छापू का मी?’

मी थोडा चक्रावून गेलो! कारण अशी छापून काढायची शक्कल असू शकते यावर मी कधी विचार देखील केला नव्हता! ‘बघा, ठरवा मग कळवा’. म्हणून ती प्रत त्यांनी माझ्या हातात परत देत म्हटले. पटकन ठरवून मी म्हटले, ‘हो चालेल छापा ’. ‘तुमच्या पेपरचे सर्क्यूलेशन किती?’ ते म्हणाले, ‘दोन्ही रेल्वेच्या बुकस्टॉलवर आणि उपनगरातले किरकोळ विकणाऱ्यांकडून ते वाचले जाते. मीच वितरक आहे’. चहा संपला. ‘अरे ती बातमी खाली घे. एक मोठी जागा सोड बर का, त्यांनी माझे पुस्तक पुन्हा हातात घेत अंदाजाने जागापण ठरवली होती.

ती माझी त्यांची भेट! नंतर मला श्रीनगरला मुंबईच्या विविध भागातून लोकांची पत्रे यायला लागली. ‘तुमचे लेख वाचून उत्सुकता लागली आहे’. काहींनी ‘सगळी थापेबाजी वाटते बुवा ’, ‘असे अंगठ्याच्या ठशावरून कोणी भविष्य सांगणे शक्य नाही!’. अशी उलट सुलट मते व्यक्त करणारी पोस्ट कार्डे, आंतरदेशीय अधूनमधून येत राहिली. ते धारावाहिक प्रकाशन केंव्हा छापून संपले ते

कळले नाही. मानधनाबद्दल प्रश्नच नव्हता. पण माझ्या अंदाजाने विरार ते चर्चगेट, कसारा, कल्याण, कर्जत ते व्हीटी संपूर्ण लोकलच्या पट्ट्यात 'नाडी भविष्य' म्हणून काही असते याची तोंड ओळख जरूर झाली असावी.

मधे बरीच वर्षे लोटली. तोवर मी पुण्यात पोस्टींगला आलो होतो. एकदा अप्पा बळवंत चौकातील खरेंच्या पेपर एजन्सी दुकानात बोलत असताना त्यांच्या नोकरांपैकी कोणी माझे नाव ऐकून खऱ्यांना म्हणाले, 'अहो ते नाडी भविष्याच्या पुस्तकाचे काही गठ्ठे माळ्यावर आहेत ते त्यांना परत करा '. मला आश्चर्य वाटले.

सप्टेंबर १९९४ मधे या पुस्तकाच्या ५००० कॉपीज पैकी ४५०० कॉपीज खऱ्यांनी आपल्या टेंपोतून विकायला नेल्या होत्या. त्याचे विक्रीचे पैसे ड्राफ्टने रीतसर पाठवले होते. आता या प्रती कुठल्या? व किती? ते पाहून कळवतो दोन दिवसात म्हणून ते म्हणाले.

मला थोडा धक्का बसला होता. आता इतक्या प्रती मी नेणार कशा? व ठेवणार कुठे? तिथून बाहेर पडलो, पायी चालता चालता प्रभात टॉकीज जवळ थबकलो. तिथे शिंगोटे यांचे एक ऑफिस होते. कोणी नातेवाईक ते चालवत होता. त्याला विचारले की मुरलीधरजी सध्या कुठे असतात वगैरे त्यावेळी मनांत या उरलेल्या प्रतींबद्दल काही नव्हते. ते फोनवरून बोलले. इतक्या वर्षांनी देखील ते म्हणाले, 'हो आठवतेय, तुम्ही मला भेटला होतात वगैरे, आता नविन काही लिहिलेय का?' वगैरे. मी सहज बोलून गेलो, ' हो आता नाडी भविष्यावर इंग्रजी, हिंदी, गुजराथीत पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. वगैरे....'

मी सहज त्यांना म्हटले की अशा काही जुन्या आवृत्तीच्या प्रती आहेत त्यांचे वितरण कसे करावे याची काळजी आहे. 'हो का? मग द्या की पाठवून जितक्या जातील तेवढ्या विकू.' असे म्हणून त्यांनी त्यांच्या मॅनेजर नातलगाला सांगून त्या जवळजवळ ७ शे प्रती दिल्या, ज्या मी नंतर खरेंकडून रिक्षात घालून त्यांच्याकडे पाठवल्या. नंतर त्या त्यांच्या पद्धतीने विकल्या गेल्या. मी कधी किती पैसे झाले वगैरे विचाराच्या फंदात पडलो नाही. माझ्यासाठी त्या कोणाच्या तरी हाती वाचायला मिळाल्या याचे समाधान जास्त होते. पुढे जंगली महाराज रस्त्यावर पुण्यानगरीचे

ऑफिसात मी त्यांना भेटले होतो. आता ते सफारी पोषाखात भेटले. मी त्यांना त्यांच्या तमिळ पेपरातील डीटीपीचे काम करणाऱ्या टायपिस्ट लोकांकडून नाडी ग्रंथांवर आम्ही तयार केलेल्या डेटा बँक प्रोग्राममधील डेटा टाईप करून हवा आहे. त्यासाठी मदत मागितली. ते म्हणाले, 'आमच्या तमिळवाल्या संपादकांशी बोला. मी सांगितले आहे काम करायला म्हणून सांगा'. अर्थात मी तसे केले पण त्यातले तमिळ टायपिंग साध्या टायपिंग प्रमाणे नसल्याने अनेकांनी जसा नकार दिला तसेच झाले. असो. नंतर एकदा सहज फोनवरून बोललो होतो. तेंव्हा ते जुन्नरकडे गावात जास्त वेळ असतात असे कळले. मग पुन्हा भेट झाली नाही...

------

प्रतिपक्ष वरून भाऊ तोरसेकरांनी अक्षरशत्रू संपादक या शीर्षकाने त्यांच्या स्मृतींना उजाळा दिला म्हणून मला ही स्मृती श्रद्धांजली लिहायला प्रेरणा मिळाली.

*तेंव्हा डॉ. नरेंद्र दाभोळकरांनी नाडी भविष्यावरून मला लक्ष्य करून काही लेख प्रकाशित केले होते.

 कै. मुरलीधर शिंगोटे आणि नाडी ग्रंथ भविष्य